व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय व अधिनस्त कार्यालयांतील गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचा-यांच्या नियतकालीक/विशेष विनंती/विभागीय बदल्या ह्या ऑनलाईन (Computerised) पद्धतीने राबविण्याच्या कार्यपद्धतीस मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग**
**शासन शुद्धीपत्रक क्रमांक: संकिर्ण-१११९/प्र.क्र.२४/१९/व्यशि-५,**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ सप्टेंबर, २०१९.

वाचा : शासन निर्णय, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, क्रमांक: संकिर्ण-१११९/ प्र.क्र.२४/१९/व्यशि-५, दिनांक २०.०९.२०१९.

**शासन शुद्धीपत्रक:-**

संदर्भाधीन शासन निर्णयातील व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय व अधिनस्त कार्यालयांतील गट-क व गट-ड संवर्गातील कर्मचा-यांच्या नियतकालीक/ विशेष विनंती/ विभागीय बदल्या ह्या ऑनलाईन (Computerised) पद्धतीने राबविण्याच्या कार्यपद्धतीतील टप्पा-२ मधील नमूद "२.५ गट-"क" ते गट-"ड"कर्मचारी दि.३० जून रोजी ३ वर्षे पूर्ण किंवा त्यापेक्षा जास्त सेवाकाळ होतील अशा कर्मचा-यांना बदलीपात्र ठरविण्यात येईल."

**ऐवजी**

"२.५ गट-"क" संवर्गातील ज्या कर्मचा-यांचा धारण केलेल्या पदावर दिनांक ३१ मे, रोजी महाराष्ट्र राज्य शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील कलम ३ (१) मधील तरतूदीनुसार सेवाकाळ पूर्ण होईल अशा कर्मचा-यांना बदलीपात्र ठरविण्यात येईल.

गट ड मधील कर्मचा-यांसाठी सामान्यपणे पदावधी निश्चित केला जाणार नाही. ते ज्या ठिकाणी काम करत असतील त्या ठिकाणच्या बाहेर ज्या ठिकाणी त्यांनी बदली करण्याची विनंती केली असेल तेथे निर्बाध रिक्त पद असल्याखेरीज किंवा परस्पर संमतीने बदली मागितली असल्याखेरीज किंवा त्यांच्याविरुद्ध गंभीर स्वरूपाची साधार तक्रार आली असल्याखेरीज त्यांची त्या ठिकाणाहून अन्यत्र बदली केली जाणार नाही." असे वाचण्यात यावे.

सदर शासन शुद्धीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०९२७१४५१४३९००३ असा आहे. हे शुद्धीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Baban Sheshrao Mandwe

Digitally signed by Baban Sheshrao Mandwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d101a905c7fca95ea9a4a68053d53dda9fcd8b54a203c383517611e96421b187, serialNumber=1aa5b45b907b3656679abdeb9469faf1da391d1546ceaae47f19acd496b13685, cn=Baban Sheshrao Mandwe
Date: 2019.09.27 14:52:50 +05'30'

**( ब. शो. मांडवे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत**

१. मा. मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. अपर मुख्य सचिव, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
४. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर ( संचालनालयामार्फत )
६. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी ( संचालनालयामार्फत )
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर.
९. कक्ष अधिकारी (व्यशि १), कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती ( व्यशि ५ ).